**मौजे मलकापूर, जि. बुलढाणा येथील चाळीसबिघा परिसरातील नगरपरिषद प्राथमिक शाळा क्र.४ जागा मलकापूर शिक्षण समिती मलकापूर यांना सवलतीच्या दराने देणेबाबत शासन निर्णय दि.१७.१२.२०१६ व दि.०६.०९.२०१८ अन्वये दिलेली मान्यता रद्द करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः- एमयुएन-२०१६/प्र.क्र.२९८/नवि-१८**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक- २०.०५.२०२२

वाचा:- १) शासन निर्णय, नगर विकास क्र.एमयुएन२०१६/प्र.क्र.२९८/नवि-१८,दि. १७.१२.२०१६
२) शासन निर्णय, नगर विकास क्र.एमयुएन२०१६/प्र.क्र.२९८/नवि-१८,दि. ०६.०९.२०१८
३) मुख्याधिकारी, नगरपरिषद मलकापूर यांचे पत्र क्र. नपम/मुअ/बांध/३१९५/२०२१, दि.२२.१२.२०२१
४) मुख्याधिकारी, नगरपरिषद मलकापूर यांचे पत्र क्र. नपम/मुअ/बांध/३०/२०२२, दि.०६.०१.२०२२
५) नगरपरिषद मलकापूर सर्वसाधारण सभा ठराव क्र.३ दि.२६.१०.२०२१ तसेच विशेष सभा ठराव क्र. १, दि.२२.१२.२०२१

प्रस्तावना:-

मौजे मलकापूर येथील चाळीसबिघा परीसरातील टि.पी. स्कीम नं.१, भुखंड क्र. २४८ मधील १.६६ हेक्टर (१०६६० चौ.मी.) मलकापूर नगरपरिषदेच्या मालकीची जागा "मलकापूर शिक्षण समिती, मलकापूर" या संस्थेस १० वर्षासाठी हस्तांतरीत करण्याबाबत शासन निर्णय दि.१७.१२.२०१६ अन्वये मान्यता देण्यात आली होती. तसेच शासन निर्णय दि.०६.०९.२०१८ अन्वये भाड्याची रक्कम ठरविण्यासाठी स्वविवेकानुसार नगरपरिषदेने निर्णय घेण्यास शासनाने मान्यता दिली होती. तथापि सदर जागा अद्याप नगरपरिषदेच्याच ताब्यात असून शिक्षण समितीस ताबा देण्यात आलेला नाही, असे नगरपरिषदेने शासनास कळविले आहे, सदर बाब विचारात घेऊन नगरपरिषदेने दि.२२.१२.२०२१ रोजी ठराव क्र. १ अन्वये २/३ पेक्षा जास्त बहुमताने ठराव पारीत करुन शासनाचे दि.१७.१२.२०१६ व दि. ०६.०९.२०१८ रोजीचे आदेश रद्द करण्याची शिफारस केली आहे. तसेच या जागेवर अद्ययावत अभ्यासिका बांधण्याचा निर्णय घेतला आहे. सदर वस्तुस्थिती विचारात घेऊन शासन निर्णय दिनांक १७.१२.२०१६ तसेच दिनांक ०६.०९.२०१८ अन्वये देण्यात आलेली मान्यता रद्द करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती, त्याप्रमाणे शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

शासन निर्णय:-

मौजे मलकापूर येथील चाळीसबिघा परीसरातील टि.पी. स्कीम नं.१, भुखंड क्र. २४८ मधील १.६६ हेक्टर (१०६६० चौ.मी.) मलकापूर नगरपरिषदेच्या मालकीची जागा "मलकापूर शिक्षण समिती, मलकापूर" या संस्थेस हस्तांतरीत करण्याबाबत व सवलतीचा दर निश्चित करण्याबाबतचे

अनुक्रमे शासन निर्णय दि.१७.१२.२०१६ व शासन निर्णय दिनांक ०६.०९.२०१८ अन्वये देण्यात आलेली शासन मान्यता याव्दारे रद्द करण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०५२०१११७१९५४२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VILAS NATHA DHAIJE

Digitally signed by VILAS NATHA DHAIJE
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=2cbfac8a74f547d6db7c665bc59a04c3d5f9e582a842e3ae0aac1309f797f88a,
serialNumber=9b34e2dd1552c4209100df5fb96a2cdcb5ce5ac0a7e1df80a5aa7ed2f6e611a5, cn=VILAS NATHA DHAIJE
Date: 2022.05.20 11:20:32 +05'30'

**( वि. ना. धाईजे )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद संचालनालय, वरळी, मुंबई.
२) जिल्हाधिकारी, बुलढाणा
३) मुख्याधिकारी, नगरपरिषद मलकापूर, जि.बुलढाणा
४) अध्यक्ष, मलकापूर शिक्षण समिती, मलकापूर, जि. बुलढाणा; (व्दारा - मुख्याधिकारी, नगरपरिषद बुलडाणा, जि. बुलडाणा)

**प्रत,**

१) मा. राज्यपाल महोदयांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.मंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा.राज्यमंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) अपर मुख्य सचिव (नवि-२) यांचे विशेष कार्य अधिकारी, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) निवड नस्ती, कार्यासन नवि-१८.